**वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणाऱ्या थेट कर्ज योजनेतील अटी व शर्तीमध्ये सुधारणा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन शुद्धिपत्रक क्रमांक : थेकयो-२०२२/प्र.क्र.४३/महामंडळे**
मोतीमहल इमारत, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०
दिनांक : १७ एप्रिल, २०२५

**संदर्भ :** १) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : महामं-२००४/प्र.क्र.३८/विघयो-२, दिनांक ३०.११.२००४
२) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : वनाम-२०२०/प्र.क्र.१३९/महामंडळे, दिनांक १४.०२.२०२२
३) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन शुध्दिपत्रक क्रमांक : वनाम-२०२०/प्र.क्र.१३९/महामंडळे, दिनांक ०१.०७.२०२२
४) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : वनाम-२०२३/प्र.क्र.२५/महामंडळे, दिनांक २४.०३.२०२३

**शासन शुद्धिपत्रक :-**

वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळामार्फत राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करून देण्याकरिता संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये थेट कर्ज योजना राबविली जाते. संदर्भ क्र.२ येथील दिनांक १४.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयांन्वये सदर थेट कर्ज योजनेच्या कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरून रु.१,००,०००/- पर्यंत वाढविण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र. ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेमध्ये सुधारणा करण्यात आल्या आहेत. आता, दिनांक १४.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

- **अटी व शर्ती-**

**यामधील अट क्र.४ व ११ येथे नमूद मजकूर वगळून त्याऐवजी खालीलप्रमाणे वाचावे -**

४. लाभार्थीच्या जामीनदाराने सादर केलेल्या हमीपत्राची संबंधित कार्यालयांकडून पडताळणी करुन घेण्यात यावी.

११. ही अट रद्द करण्यात येत आहे.

तसेच, संदर्भ क्र.३ येथील शासन शुध्दिपत्रक दिनांक ०१.०७.२०२२ मधील अट क्र.३ रद्द करण्यात येऊन शासन निर्णय दिनांक १४.०२.२०२२ मधील अट क्र.६ पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे :-

६. सदर कर्जातून लाभार्थीसाठी जी मत्ता निर्माण होणार आहे ती ज्यांच्याकडून निर्माण होईल त्यांचेकडून ती मत्ता चल (Movable) मालमत्ता असेल तर परस्पर वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाकडे तारणगहाण (Hypothecate) करण्यात यावी.

**२.** सदर शासन शुद्धिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०४१७१८०३२९३५३४ असा आहे. हे शासन शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAHIL MAHADEV DHANWADE

Digitally signed by SAHIL MAHADEV DHANWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=393cd08ed02c7d151f264e32cdad83db848ccb3c33d5d6254e4ab7dc8c58b3b1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=080CFC4AB018C3B658C71325006154CA250D25A3B8F476AC4EE4C2BD9C4CD79A, cn=SAHIL MAHADEV DHANWADE
Date: 2025.04.17 18:04:49 +05'30'

**(साहिल धनवडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई.
५. निवडनस्ती (महामंडळे).